# धर्म, मेंदू, कला आणि मी...

**-- चं.प्र.देशपांडे.**

## धर्माबाबत...

लक्ष ठेवले --
काय घडते शरीरात
अवतरताना अमर्यादता --

खालचा मेंदू
ताणमुक्त होताना दिसला

-- सर्व धर्मांनी सांगितलेले
एका शारीरिक सत्यात उघड --

खालचा मेंदू मुक्त होण्यातच
व्दंव्द नष्ट. दुःख नष्ट.

-0-0-

एका शारीरिक चुकीमुळे
हजारो मानसिक प्रश्न
जे धर्मांनी हाताळले

इतक्या विचारांची
मेहनत नकोच -- रहस्य तर
हे एकच समोरच आहे --

--0-0-

खालचा मेंदू -- माकडहाडापर्यंत --
स्वतःला अलग करून
वरच्या मेंदूला कंट्रोल करण्याचे
प्रयत्न करतो तेव्हा होतो ताणमय
-- ऐच्छिकता प्रवेशते सर्व कृतींत --
दोन्ही मेंदूंमधला ताण
सतत प्रयत्नमय
-- हीच होते एक मर्यादित वस्तुस्थिती
-- हाच अहंकार --
ज्याच्यामुळे विभाजन --
मी-इतर -- जे मन

अन् प्रचंड महत्त्वाचे विशेष --
खालचा मेंदू स्वतः

स्वतःच्या ऐच्छिक क्रियेच्या क्षेत्रात !
स्वतःच्या इच्छेने
तो थांबवू शकतो
त्याची ताबायंत्रणा !

सर्व विभाजन एकात्म होते
मस्तकोच्च बिंदूतून
फुटून... पूर्ण ...बाहेर...
लोपवत  'आत-बाहेर'...

आता एकात्मता !
ताण नाही, व्दंव्द नाही !
अविभाज्यता -- नसणेपणाची --
सर्वव्यापी -- जिवंत --
अमर्याद --
अन् रोमांच --

हीच ती धर्मघटना
जी घडण्याचा मार्ग
माझ्यातच -- समोर --

-0-0-

धर्म हा इतकाच आहे
एक शारीरिक बदल
हे लक्षात येताना
आधी, आगे, मागे, पुढे
घेतलेले काही
स्नॅप्स ...

-0-0-

**मेंदूबाबत...**

मनच दुःख
मनच दडपणं
मनाच्या सर्व कृती अर्धवट
मनामुळेच इच्छा, वासना, हाव,
भीती...

असे जर आहे तर
मनाच्या गोंधळाची
एवढी सविस्तर चर्चा कशाला ?
मनच फक्त माहीत आहे म्हणून ?
-0-0-

मस्तकाच्या उच्च बिंदूतून
फुटून बाहेर
ताबाहीन जाणीव
किंवा
समोर सतत टाकत
टाकत शरीरमन
ही जाणीव

जाणीव ही वर
किंवा मागे असते
( अन् सर्वत्र )

शरीरमनाला मागे ठेवून
पुढे वावरणारी जाणीव
असते अलगता ...
मनाच्या ताब्यातील
जायबंदी तडफड..

-0-0-

सवय फक्त मनाला असते.
मन टाकण्याची कृती
सवय नसते.

-0-0-

मनाने टाकलेला शेवटचा खोडा
असतो --
संपूर्ण रचनेची उलथापालथ चालेल ?

यातून सुटणे अवघड आहे.

मनाला आहे ती स्थिती हवी
ते विजयी होणे
म्हणजे पराभवच

भयहीन होण्याची भीती
हा शेवटचा प्रश्न

-0-0-0

समाजाभिमुख असणे
किंवा एकलकोंडे असणे
-- दोन्हीही अलगताच.
अलगता हाच मुख्य प्रश्न.

यातूनच सगळी दडपणे -- युध्दे.
अलगता म्हणजे भय.
भयग्रस्तता वैयक्तिक.
निर्भयता कुठे वैयक्तिक ?

सर्व अवकाश खच्चून भरून
मनाच्या घट्ट ताबारेषेत जगणे
म्हणजे अलगता.

अलगतेत सर्वच भ्रामक.
अलगता टाकताच जिवंत अवकाश
स्वच्छ.

अलगता टाकण्याची कृती
अटळ कल्पनाशक्तीतून स्फुरते
प्रत्यक्ष टाकण्याच्या कृतीत
कल्पना नसते.

अलगतेचा शाप असलेले --
सर्वच -- चंगळवादी --
एकमेकांना चंगळवादी म्हणणारे
भयग्रस्त.

-0-0-

ताबा असतानाही
भरकटलेपण असते
पण वेडाला पध्दत तरी राहते --
ताबा सोडला तर फक्त अराजक --
हे असते
अलगता टिकवण्याचे तत्त्वज्ञान

अलगता टाकण्यात
कुठे हे सगळे ?

हे दिसूनही
चालतो सर्वात मोठा वेडेपणा --
अलगता टाकून
अलगतेचे आयुष्य
जगण्याचा महातीव्र प्रयत्न
वेदनामय.

-0-0-

अलगतेत तर्कशास्त्र.

अलगता टाकण्यात कोणता तर्क ?
एवढे तर्काने पटले तरी
' अलगता टाकते कोण ? '
-- हा प्रश्न.
या प्रश्नातच असतो एक ठाम निर्णय --
अलगता टाकणे शक्य नाही.
आणि उडत राहतो जगाचा धुव्वा.
दुःखपिसाट जगाला
दुःखपिसाटतेतच वाटते सुरक्षितता.
काहीही होवो.

-0-0-

स्थिर आणि घट्ट
असण्यात खात्री -- तीच सवय.
इथून सर्व कृतींचा उगम
असणे म्हणजेच संघर्ष.

काहीच नसण्याचा मोकळा जिवंत अवकाश
होऊ शकतो उगमस्थान कृतींचे.
हे ओळखीचे जगणे असू शकत नाही.

तरीही सवयीचा कब्जा --
वारंवार ग्रस्तता.

-0-0-

हेही नाही आणि तेही नाही
असे होऊ नये म्हणून
बुध्दिभेद टाळावा
तर
असलेले जे विध्वंसकच आहे
ते तरी नीट चालू द्यावे
असे नाही होत ?

बुध्दिभेदाची भीती
असलेल्या सवयींची तीव्रता
वाढवत नेईल.

वेदनामयतेच्या सत्यतेबद्दलचे
प्रश्न
टाळायचे ठरले
तर उरते फक्त
मृत्यूची वाट पाहणे
किंवा त्याला आधीच कवटाळणे

भरकटून कोसळतानाही
वेदनेचीच महती गावी
असे का वाटते ?
-- या प्रश्नाने
बुध्दिभेद होणारच.

-0-0-

एक सोपा सहज अवकाश
एकमेव, अमर्याद आणि जिवंत,
काहीच न करावे लागणारा,
कष्टहीन, आणि
नुसतीच एक काल्पनिक
पोकळी नसलेला --
प्रत्यक्ष ...

हाच धर्म
अनेक धर्म असूच शकत नाहीत

फलाशा न धरता कर्म करण्याचे
तत्त्वज्ञान अंमलात येऊ शकत नाही
कारण अलगतेच्या भूमीत
फलाशेशिवाय काही उगवूच शकत नाही...
अवकाशात उगम पावलेल्या
कृतीच फक्त --
अस्पर्श...

शास्त्राच्या कक्षेत
हा सापडणार नाही...
मानवी बुध्दीचे
अतिसूक्ष्म सापळेही
इथे निरुपयोगी...

अधिकाधिक विशिष्टतेकडे
जाणाऱ्या सर्वांना
अशक्य वाटणारा
हा अप्राप्य अवकाश...

-0-0-

साठवणच बाहेर टाकणारे
आतून बाहेर
जगताना
सर्व एकरूप

ताबाविहीन
जिवंत
काहीच नसणे ...

-0-0-

थांबलेपणात भर घालण्यापेक्षा
ते टाकता येण्याचा खरा प्रश्न --
एक शॉर्टसर्किट होऊन
ठिणग्या उडत राहणे
हेच थांबलेपण

जे टाकताच
कंटाळा नाही.
चिडचीड नाही.
टेन्शन नाही.
मुख्य म्हणजे
भविष्यात सुरक्षित राहण्याचे विचार
नाहीत.

इतक्या साध्या सत्यासाठी
इतके धर्म
आणि इतके जडजंबाल
...हा तर
थांबलेपणातला विध्वंस...

-0-0-

सर्व परिणाम
बाहेरून आत
होताहेत तोपर्यंत
चेचलेपण,
निवड करण्याचे परिश्रम
आणि
तोंड देत राहणे.

-- हेच जगणे ?
जणू स्वयंचलित ?
धडकेल तिथे धडकेल ?
कोसळेल तिथे कोसळेल ?

-- नाही.
मन बाहेर
आणि
संपूर्ण जिवंत नाहीपण...

-- हाच धर्म -- ज्याला
समाजाचा सक्त विरोध.

समाज म्हणजे
शेकडो धर्मांच्या मागे
बोंबलत फिरणारे
सगळे -- तोंड देणारे ...

-0-0-

बाहेरून आत
जगताना
माणसे, वस्तू, परिस्थिती
यांचे परिणाम
-- त्यांची तीव्रता --
स्वभावावर अवलंबून
आणि त्याचे
शरीरांतर्गत दबाव ...
किती तीव्रतेनंतर
कोसळून पडेल सारे
याची मर्यादा अंगभूत ...

आतून बाहेर जगताना
परिणामकेंद्र नाही...
स्वभावाचा -- तीव्रतेचा
प्रश्न नष्ट
आणि
आत -- बाहेर सर्व एक
कारण नियंत्रणकेंद्र
नष्ट ...

नुसते संपूर्ण
रिकाम्या जिवंतपणाचे जगणे ...

-0-0-

जे जे नाशवंत
ते ते दुःखमय
याहून थोडक्यात --
मन नाशवंत.

जे जे दुःखमय
ते ते विरून जाणारे
याहून थोडक्यात --

मनच दुःख.

-0-0-

' मी नाही ' या मंत्राने
हिंसेच्या मुळाशी स्फोट झाला
-- हिंसा नष्ट करण्याचे माझे प्रयत्न
सुध्दा त्या स्फोटात उडाले.

गूढ म्हणजे न कळू शकणारे.

हाताला दृश्य गूढ
पण डोळ्यांना ?

सवयीत सामावू शकणार नाही
ते न कळणारे
पण खुद्द सवय ?

सवय समजणे
क्षणोक्षणी
हे सवयीच्या क्षेत्रात
कायमचे गूढ...

-0-0-

विचाराचे काम हे फक्त
वरच्या मेंदूचे आहे याचे
भान सुटणे म्हणजे
मान, गळा यांनाही
विचारात सामील करणे
-- यामुळेच दुःख,
चिंता आणि अविश्रांत परिश्रम.

विचारवल्लीची मुळे
अशी खाली उतरणे
विषारी.

विचार स्थानभ्रष्ट
म्हणजे सगळे
आयुष्य भ्रष्ट.

-0-0-

विचार हा फक्त
मेंदूत चालतो

देहाच्या इतर कोणत्याही भागात
अथवा
देहाबाहेरील वस्तू, व्यक्ती,
परिस्थितीत नाही...
असे इतरत्र विचाराचे क्षेत्र
मानले जाणे हाच भ्रम
ज्यातून प्रचंड ताणतणाव...
विचाराचे क्षेत्र -- वरचा
मेंदूच राहणे
हाच धर्म.

-0-0-

राग, प्रेम व्देष, असूया,
हेवा, मत्सर, संताप, हाव आणि
त्यांच्या निरनिराळ्या वेदना आणि विध्वंस
असे हजारो प्रश्न नाहीतच
प्रश्न एकच आहे --
विचाराचा उगम वरच्या
मेंदूव्यतिरिक्त इतरत्र मानला जाणे.
' मानणे ' जाताच मेंदू फ्री ...

-0-0-

क्षणात सगळे
प्रत्यक्ष नाशवंत पाहणे
याच्यासारखी विश्रांती नाही...

-0-0-

माहिती काहीही -- कितीही असूनही -- वरच्या
मेंदूव्यतिरिक्त इतरत्र
विचाराचे उगमस्थान
मानण्याचा भ्रम
ताणमय...

तो जाताच
शरीरांतर्गत सर्व ताण
सैल पडून विलय
पावतानाच
मानेच्या वरच्या भागात
जागृती उगम पावते...
ही तेवत राहणे
हेच जगणे...
इथे कोणताच परिणाम नाही...

स्पर्श नाही...

-0-0-

वरचा मेंदू हेच फक्त विचारक्षेत्र असते
तेव्हा प्रश्न नसतात --
फक्त वस्तुस्थिती असते...

अस्मिता, मतमतांतरे, भेदाभेद, प्रणाली,
द्वेष, सूड, जयपराजय, यशापयश,
मतस्वातंत्र्य, सहिष्णुता, हिंसा-अहिंसा,
तडजोड -- हे सर्व वरच्या
मेंदूव्यतिरिक्त इतरत्र
विचारक्षेत्र मानण्याचे भ्रम...
कितीही विचाराने न पालटणारे...

भ्रम नष्ट होणे हीच क्रांती ---
भ्रमात क्रांती संभवत नाही ...

-0-0-

निरनिराळे प्रश्न, संघर्ष,
आसक्तीचे आणि दुःखाचे प्रकार
समजून घेत बसायची आवश्यकता नाही
...विचाराचे ढळणे
म्हणजेच भ्रामक नांगर टाकणे
...एका स्थिर बिंदूचे सातत्य मानणे...
हा स्थिर बिंदू म्हणजेच सगळे असंख्य प्रश्न...
विचार हा फक्त वरच्या मेंदूत चालतो
हे भान राहिले
तर स्थिर बिंदू नाही...
प्रश्न नाहीत...

तत्त्वज्ञानाचे प्रचंड डोलारे,
असंख्य धर्म-गुंताडे
अनावश्यक.

-0-0-

आता विचारक्रिया फक्त वरच्या मेंदूत
आणि मनाचा
जागृत आणि सुप्त हा भेद नष्ट
आणि आश्चर्य हे की
मेंदूबाहेरही जाणीव
आतबाहेर या भेदाशिवाय...

ही काही मेंदूची विचारकृती
नाही...

-0-0-

खरे तर माहिती, अनुभव,
स्मृती यांनी युक्त असा मेंदू
आहे -- पण मन
ही एक अफवा आहे --
भ्रामक ताबायंत्रणा...

शरीरासाठी असणारी ताबायंत्रणा
अनुभव आणि स्मृतीच्या क्षेत्रात
घुसणे --
हेच मन.

-0-0-

दुःखातून सुटका
दुःखात राहून होणार नाही...

-0-0-

संघर्ष नसणे म्हणजे स्वातंत्र्य
ताबा नसणे म्हणजे शांतता

संघर्ष टाळण्याचे प्रयत्न
ताबा घालवण्याचे प्रयत्न
भयंकर वेदनामय

प्रयत्न म्हणजेच ताबा आणि संघर्ष...

-0-0-

भय का आहे
सुखाची लालसा कशातून जन्म घेते
दुःखाचा उगम कुठे आहे
आत्मकेंद्र का तयार होते
सत्य जर सनातन आहे तर
त्यातून असत्य कसे उद्‌भवते
वगैरे सर्व प्रश्न गैरलागू आहेत --
बौध्दिक उत्तरे नसलेले प्रश्नही
बुध्दी विचारणारच

बुध्दीला गूढ असणारे
काही नाहीच
असे गृहीत धरावे का...बुध्दीनेच...
या प्रश्नाचे काय ...

-0-0-

माझ्या आयुष्याला
माझाच बोझ
जो मीच जगणार ...

-0-0-

बंद होण्याचे केंद्र
खालच्या मेंदूत
जिथून वरचा मेंदूही
बंद.

बंदपणाच्या वरवर अगदी
किंचित् जागेत हालचाल
जिला सतत बंदपणाचा
ताण.

खालच्या मेंदूने ताबा सोडताच
गुलामगिरी नष्ट
आणि नुसतेच
स्वातंत्र्य.

आता वागता येते पूर्ण
वरच्या मेंदूने
खालच्या मेंदूतून घडताना जिवंतपणाचे
सर्वत्र
स्फोट.

-0-0-

असलेले टाकण्याची कृती --
आणखी मिळवण्याच्या
पध्दतीत कशी बसेल ?

समाधान मिळवण्याचे प्रयत्न
-- वेदना टाकण्याची कृती
होऊ शकत नाहीत.

-0-0-

शंभर विकृतींची सविस्तर वेगवेगळी
चर्चा करण्यापेक्षा
सर्व विकृतींचे मूळच पाहावे

विचार हा फक्त वरच्या मेंदूत
चालतो -- इतरत्र नाही
हे सत्य पाहताच सर्व
विकृती नष्ट...

करुणा, अहिंसा,
शांतता, प्रेम
आपोआप...

-0-0-

सवयीतून बाहेर पडणे
म्हणजे
नवीन असत राहणे

याची सवय होऊ शकणार नाही

-0-0-

विचारक्रियेचे क्षेत्र
फक्त वरचा मेंदू

धर्मसारांश
हा एवढाच...

-0-0-

मेंदूला होणारे
वस्तूंचे, माणसांचे
ज्ञान
शरीराचा भाग बनते
पण
वस्तू आणि माणसे
शरीराचे भाग बनत नाहीत

शरीराची ताबायंत्रणा
भलतीकडेच घुसते
आणि हाहाःकार होतो...

-0-0-

अशक्य जबाबदारी घेऊन
खालचा मेंदू सतत ताणमय
म्हणूनच
गुंगी, सेक्स -- या ताण
सैल करणाऱ्या गोष्टींचे महत्त्व.

साम्यवाद चांगला किंवा
मारुतीची उपासना चांगली
असे म्हणून
जग सुखावह करण्याचे प्रयत्न.

खालच्या मेंदूचे काम शरीराचे नियंत्रण --
त्याचा जगावर ताबा कसा येईल ?

अनावश्यक -- अशक्य जबाबदारीतून
खालचा मेंदू मुक्त होणे
हाच धर्म ...

-0-0-

स्मृतीचा उपयोग
शरीराच्या सुखासाठी करावा
असे खालच्या मेंदूला कधी वाटले
तो नेमका क्षण
माहीत व्हायची गरज नाही
पण
तो मानवजातीचा नाशबिंदू होता
हे कधीही पाहता येते

खालच्या मेंदूचे हे भ्रामक फंक्शन
गेले की सर्व सत्यच आहे...

-0-0-

दुःखाची जागा
वरच्या मेंदूत नाही
खालच्या मेंदूत आहे

खालच्या मेंदूत
कमीजास्त होणारा ताण
हेच दुःख

-0-0-

आवडनिवड

मानापमान
आक्रमण -- संरक्षण
यांना फक्त
खालच्या मेंदूच्या
चुकीच्या फंक्शनिंगमध्येच
स्थान
एरवी
या गोष्टी
अस्तित्वात नाहीत...

-0-0-

खालचा मेंदू मुक्त असणे
हेच भान, हीच एकात्मता,
हेच स्वातंत्र्य, हेच निर्वाण.

हजारो वर्षे
परिणामांची चर्चा झाली --
सगळे अवघड झाले

' मी ' म्हणजे काहीतरी
शारीरिक चूक असणार
हे पाहिले गेले नाही

विचार, निर्णयप्रक्रिया,
निवड, कृती -- यांत खालचा मेंदू
मुक्त म्हणजेच परिपूर्णता ...

-0-0-

विक्षेपामुळे शक्ती क्षीण होते
खालच्या मेंदूचे अतिक्रमण हाच विक्षेप.
तो जाताच सर्व शक्ती उपलब्ध.
ही काही खालच्या मेंदूची
वस्तुगत शक्ती नसते.
अलगता नसणे हीच शक्ती.

-0-0-
' मी ' जाणे
म्हणजे काही कमी होणे नाही
उलट
विभाजन गेल्याने एकात्मता
आणि
शक्ती हे अमर्याद वाढीव परिमाण.
-0-0-

कुठल्याही कारणाने लांबणीवर टाकू नये
अशी ही एकच गोष्ट --
जगण्यातला खालच्या मेंदूचा उपरा वापर सोडून देणे.
कशासाठी त्रास ?
अलगतेत जगल्यानेच चुका होतात...
इथे तर
चूक -- बरोबर हा प्रश्नच नाही...

-0-0-

खालच्या मेंदूच्या ताणातून उगम
पावणारी कृती परिपूर्ण
असूच शकत नाही

नीतीने वागणे की न्यायाने वागणे
बरोबर
असा प्रश्न पाडणारा प्रसंग शक्य

म्हणजेच निरनिराळ्या मूल्यांच्या
व्यक्तिगत रचनांची
टक्कर शक्य

मूल्य एकच हवे आणि ते
व्यक्तिनिरपेक्षच हवे
तरच शहाणपण...शक्य...

-0-0-

ताबा ठेवण्यासाठी
खालचा मेंदू
स्वतःला अलग समजतो
-- हेच ते घातक विभाजन ...

-0-0-

कशावरही उपाय म्हणून
ताबा सोडला जाऊ शकत नाही
कारण तो
तो राहून
तो सोडण्याचा प्रयत्न होतो

स्वातंत्र्य म्हणजे
नुसती बदललेली परिस्थिती नव्हे

-0-0-

खालच्या मेंदूचा ताबा असल्यावर
असणारे विचार, मूड्स्, मनःस्थिती
ताबा सोडल्यावर
नसतात

ताबा सोडून याच गोष्टी राहाव्या
असा प्रयत्न म्हणजे
ताबा न सोडता
आहे तीच बोंब चालू ठेवणे...

-0-0-

खालच्या मेंदूत
ताण नाही याचा अर्थच
वरच्या मेंदूसह एकसंध कृती

दोन्ही मेंदू एकत्र
होताच
त्यांच्या बाहेरही त्यांच्यासह
अस्तित्व उमलते
अमर्याद

सगळ्यांच्यात अवतरित
होऊ शकेल असे हे एकच
सत्य

-0-0-

अहंकार टाका
हे अनेक धर्म म्हणाले
पण तो कुठे असतो
कोणत्या शारीरिक चुकीमुळे
तो अस्तित्वात येतो
हे सांगितले गेले नाही

खालच्या मेंदूचा अनावश्यक
ताबा म्हणजेच अहंकार
तो सोडून देण्याची क्रिया
म्हणजेच धर्म...
हा ताबा म्हणजे ताण
ज्याचे शारीरिकही दुष्परिणाम

हा ताबा सोडल्यावर आचरण
कसे घडते
ही सर्व धर्माची तत्त्वे

ताबा न सोडता
आचरणात येऊ शकत नाहीत
-- तसे प्रयत्न ताण तीव्र करतात

शंभर विषय आणि
त्यांची चर्चा
असा गुंतागुंतीचा आणि अवघड
धर्म
भ्रम वाढवतो -- खरे तर
धर्म म्हणजे एकच चूक टाकणे ...

-0-0-

खालच्या मेंदूचे
वरच्या मेंदूच्या कार्यावर
ऐच्छिक नियंत्रण
ही रचनात्मक चूक लक्षात न घेता
केलेली मानसिक
गोंधळांची चर्चा
निरुपयोगी ठरत गेली
-- धर्म दुष्प्राप्य झाला ...

-0-0-

नियंत्रणामुळे
होणारे विभाजन
हाच मूळ प्रश्न.

-0-0-

खालचा मेंदू स्वतःही
स्वतःच्या
ऐच्छिक क्रियेच्या क्षेत्रात
म्हणूनच तो
स्वेच्छेने सोडू शकतो
नियंत्रण
आणि होऊ शकतो
स्वसंवेद्य...

-0-0-

**कलेबाबत...**

जतन करायचा अट्टाहास कशाला ?
मनात परंपरा असतेच.

असेल तेवढी असेल.
मनामनात कमीजास्तपणा.

मुख्य काय आहे ?
कला की
कलेच्या भाषेतून संपर्क साधणे ?
जे टिकेल ते टिकेल
नष्ट होईल ते नष्ट होईल.

माहीत असलेले घट्ट
धरून ठेवायचे का ठरवले ?
कुणी ?

विव्दत्तेची किंमत शून्य आहे
हे कळले
तर परंपरेचा वाली कोण ?

नुसती माध्यमाला कशाला
धार लावत बसताय ?

जे आहे तेच धारेहून
अदृश्य असून ?

-0-0-

ही कविता नाही.
जे दिसते तेच फक्त.

ज्या विभ्रमात मन अडकते
ते सेक्सी
वस्तुतः सगळे वस्तुसत्याच्या
रूपात असून
जणू काही वेगळेच व्यतिरिक्त.

मनाच्या सगळ्या कृती
जवळजवळ
अशाच सत्यस्वरूप.

प्रत्यक्ष उत्सारण
तर खोटे नाही ?
क्षणभर सर्व नाकारणारे ?

तिलाही सर्व हवे आहे
जे घडणे अशक्य.

जणू सर्व काही घडल्यासारखे
आयुष्य पूर्णतः निष्प्रभ.

-0-0-

वैयक्तिकतेचा प्रचार
म्हणजे आत्महत्येचा प्रचार.
सर्वांना एकच
दिसू शकणारे काही आहे का ?

कुठलीच व्यक्ती
मला आवडत नाही
आणि माझाही
मला कंटाळा येतो.

व्यक्तीचा व्यक्तीशी संवाद
हा भ्रम.
मी झगमगीत कविता
लिहिली असती

तर सर्वांनी
टाळ्या वाजवल्या असत्या.
माझ्या व्यक्तिमत्वाचे स्तोम
हा आधार झाला असता.

आधाराचे तत्त्वज्ञान
सोडावे लागेल
असेलच शक्य जर
संवाद.

-0-0-

मूड्सची कला
म्हणजे विषवल्लींची पैदास
मान्यवरांनाही मान्य असणारी

आनंद, दुःख, शोक,
उव्दिग्नता, वैफल्य,
भीती आणि सतत
आत्महत्येचे विचार

आहे त्या मूड्सचे प्रदर्शन मांडून
त्यांचे संक्रमण करणारी कला
वगळली
तर कितीशी उरेल ?

रममाण होण्यातले धोके
स्पष्ट दिसल्यावर
कला झगमगीत
आणि रक्तरंजित
कशी राहणार ?

अनुभवाची समृध्दता
प्रतिमांची रेलचेल
आणि अंतर्गत गुंतागुंत
यांचे रममाण जग
विषाच्या नशेत ...

-0-0-

मनाच्या एका भागाला
आकलन होऊ शकत नाही
मनाचा दुसरा भाग

मनाचा एक भाग
दुसऱ्या भागाबद्दल
बोलत असलेले
दुसऱ्या मनापर्यंत
-- अशाच दुभंगलेल्या --
-- वेगळ्या अवस्थेच्या --
कसे पोचणार ?

याच कक्षेत भरकटणारा
सर्व कलाव्यवहार
म्हणजे मानवनिर्मित प्रचंड
कचरा.

-0-0-

करमणूक आणि विशिष्ट
उद्दिष्टपूर्वक मने प्रभावित करणे
आणि
स्वतःच्या सुखदुःखांचा अनुभव
दुसऱ्यांना देणे
-- ही सर्व
दुःखभूमी बळकट करणारी कला.

खरे तर ती कुणाचीही
अपेक्षा नाकारणारीच हवी
-- तरच उल्लंघन शक्य
उद्दिष्ट नसलेले...
-0-0-

दुःख होणे हे कोणत्याही
प्रणालीने वा दृष्टिकोणाने
टळत नाही हे
लक्षात आलेल्यांना प्रश्न पडतात. याउलट
निराशावादापेक्षा आशावाद सशक्त
एकाकीपणापेक्षा
क्रांतीचा जयजयकार महत्त्वाचा
--असे खूप.
ईश्वरवादापेक्षा निरीश्वरवाद
ऊर्जादायी असतो -- हेही.
बुध्दाला काय सापडले ?
जडवादी विज्ञान ?
ही कसली क्रांती होती ?
कुणाचा गौरव, कुणाची हेटाळणी,
काय महत्त्वाचे, काय मूल्यात्मक
या सर्वांतला निधडेपणा
स्वतःचा आणि हजारोंचा
विध्वंस करू शकेल.
पण हेच आदर्श हे
आधीच ठरलेले आहे.
आता फक्त अंमलबजावणी...

आता
प्रश्न पडायचा प्रश्नच नाही ...

-0-0-

मार्ग दाखवणारी, चेतवणारी,
उद्दीपित करणारी, स्वप्नात रमवणारी
किंवा दुःखाचे रंगीबेरंगी पोत
दाखवणारी कविता
अन्यायाची, शोषणाची क्षेत्रे
फार तर बदलू शकते
पण
आमूलाग्र काही करू शकत नाही.

परंपरा--विरोध, क्रांतीचे जयजयकार
आणि एकाकीपणा आणि
दुःखरंगी शिल्पे
या सर्वांचे उगमस्थान
समान मनोरचनेत असते
तपशीलांच्या फरकांनी

त्या मनोरचनेचे आजन्म जोखड
सर्वांनाच मान्य.

म्हणून तर एकमेकांबद्दल
उपहासाने बोलणे शक्य.

भिकारड्या, प्रचारकी, प्रदर्शनी
आयुष्याचे
सगळ्यांनाच पुरेसे भांडवल.

-0-0-

स्वतःची वस्तुस्थिती
पाहण्याचे धाडस करणारे कलावंतच
संस्कृती निर्माण करतात.
व्यक्तिगत अनुभव, क्रांतीचे तत्त्व आणि
स्वतःचे उदात्तीकरण यांत
स्वतःला गाडून घेणारे नाही.
कुचेष्टा, उपरोध, क्रोध, द्वेष आणि
विरूपीकरण
ही साधनेच मुळात अडकवून ठेवणारी.

संख्येच्या गदारोळाची शक्ती
काही किरकोळ स्वार्थ साधू शकते
-- संस्कृतीच्या प्रवाहाला
स्पर्शही नाही करू शकत ...

-0-0-

मानवी जीवन समृध्द होण्याचे भान
ब्राम्हणी किंवा दलित भाषेत
व्यक्त होऊ शकत नाही
असे कुणीच सिध्द केलेले नाही.

कशावर आधारित
ही बेशुध्द लढाई ?

-0-0-
सुप्त मनाच्या मागे फिरणारे
एका भ्रामक जगात
चाचपडत राहिले.

अलगतेच्या भ्रामक सत्ताकेंद्रामुळेच
मन... उघड आणि सुप्त...
ते फेकले गेल्यावर
संपूर्ण मानसशास्त्र
ढगांत...
-0-0-

कारणे आणि परिणाम
अशा अभ्यासात
जेव्हा कला सामावते
तेव्हा ती
व्यक्तिगत, प्रचारकी, धंदेवाईक,
स्वार्थ जोपासणारी,
वैयक्तिक यशापयशाची
कौशल्यकमान फक्त असते.
तथाकथित समकालीन.

-0-0-

अर्थयुक्त कला, जगण्यातली
खालच्या मेंदूची लुडबुड रहित करते...
ती एरवीही रहितच असल्यावर
कलेची गरज नाही...
... अर्थयुक्त कला
ज्याचा उद्‌गार होऊन असणार
ते सर्व समोर क्षणात...

-0-0-

तंत्रे बदलली
अनुभव बदलले
त्या त्या काळाला
सामोरे जाणे चालू राहिले

हे अधिक व्यापक होते
ते अधिक तीव्र होते
यांनी मिथ्स् वापरल्या
त्यांनी ते टाळले

त्या त्या काळातले
स्वतःचे प्रश्न
कलेत
येत राहिले

हवे ते न घडण्याचे
नको ते घडण्याचे
प्रचंडपणे सगळे
हाताबाहेर असण्याचे

या सगळ्याचे आलेख काढले
काळानुरूप
बदलत्या दृष्टिकोणांतून

अन्वय लावले

ही संस्कृती ?
एखाद्या व्यक्तिगत जीवनासारखी
बंद
आणि सातत्ययुक्त ?

-0-0-

बहुतेक सर्व कलाकृती
खालच्या मेंदूने स्वीकारलेल्या
भ्रामक टेन्शनमधून उगम पावतात
आणि दुसऱ्या
भ्रामक टेन्शन्सना मोहवतात.

कला म्हणजे
भ्रम पसरवण्याचे आणि
घट्ट करण्याचे माध्यम

जसे राजकारण आणि धर्म...

-0-0-

प्रत्येकाची अनुभवावर आधारित
जसजशी ताबायंत्रणा
छळ, वर्चस्व आणि उपभोग
यांच्या तसतशा शक्यता.

जो कलेचा कच्चा माल
-- तोच बहुधा पक्का मालही
जेव्हा नसते कलेकडे ताबायंत्रणेच्या
मुळाशी घाव घालणारे हत्यार.

-0-0-

मनाचा तळ गाठणे
मानसिकतेचा शोध
दुःख स्वीकारण्याचा समंजसपणा
दुःखाशी सामना करण्याची धमक
ही सर्व शब्दांची कारंजी
म्हणजे फक्त
खालच्या मेंदूचे
जगण्यावर अतिक्रमण...

-0-0-

नुसता शेवट गोड हवा एवढेच नाही,
दुष्टाचा पाडावही हवा
-- या तत्त्वावर आधारित कला
म्हणजे नुसती करमणूकच नव्हे
तर ती एक
स्वतःची सुखदुःखे अबाधित
ठेवण्याची युक्ती असते.
यशाला हपापलेले,
घटनांचे भुकेले,
निवाडा करणारे
आणि स्वतःची तडफड
अधिक घट्ट करण्यात
सुरक्षितता मानणारे
मन यामागे असते.
या मनाला
प्राणपणाने बघावे
असे प्रश्न पडत नाहीत.
तडफड ही फक्त
सहनच करायची असते
हे त्याचे गृहीत असते.
कलेत त्याला
याचे समर्थन हवे असते.
दुष्ट कोण आणि शेवट
म्हणजे काय
हे त्याचे ठरलेले असते.
याला बाध आल्यास
जगणेच खतम्
हे त्याचे ठाम असते.

-0-0-

खालच्या मेंदूचा चुकीचा वापर
म्हणजेच मन.
त्याचा तळबीळ काही नसतो.
तर शोधणार काय ?
ही चूक थांबवणेच फक्त शक्य.

-0-0-
खालच्या मेंदूने पकड
सोडून दिली तर
दुःख नष्ट
त्याचबरोबर
करमणूक आणि राजकारण
यांचीही गरज संपुष्टात...
-0-0-

हजारो मानसिक प्रश्न नाहीत
एकच शारीरिक प्रश्न आहे
-- खालच्या मेंदूचा चुकीचा वापर.

ती चूक टाकल्यास
स्वच्छ दिसते,
आधार लागत नाही.

कलाक्षेत्रातले विचारमग्न चेहरे,
उंची, खोली,
गुंताडे -- सर्व झूट.

-0-0-

इथे आधुनिक मानवाच्या विदीर्णतेला उद्गार मिळतो.
इथे नियतीची अटळता स्पष्ट होते.
इथे मनातल्या व्दंव्दाचे भूमीशी नाते जुळते.
इथे आदिबंधात्मक मातृप्रतिमेचा प्रत्यय येतो.
बरे, ठीक.
त्यामुळे काय होते ?
असल्या भुक्कडपणामुळे कलाक्षेत्र
ही एक नुसती रममाण होण्याची कोठी होते.
कशातच काहीच आमूलाग्र न घडता
वांझ विव्दत्ता परजीत राहण्याचा दगड.
ताबा सोडण्याची कृती जोपर्यंत घडत नाही
सगळे तोपर्यंत नुसतेच शब्द --
उथळ किंवा बुध्दीला, भावनेला चाळवणारे,
सपाट किंवा गुंतागुंतीचे,
विनोदी किंवा शोकात्म.
नुसता अनुभवाचा विस्तार.
याने कदाचित् किरकोळ सहनशीलता वाढू शकेल
एखाद वेळेस.
अत्यंत विस्तारपूर्वक आणि प्रचंड शब्दच्छल
करून कलाकृती समजली असे वाटून
सुध्दा जर
सुखदुःखाची बोंब या बाबतीत आमूलाग्र
काहीच घडणार नसेल तर
करमणूकच ती !
मठ्ठाची किंवा विचक्षणाची ।
म्हणजे मठ्ठाचीच !

-0-0-

कल्पना जसजशी उंच आणि भव्य
कराल तसतसे शब्द येतात

तुमच्या व्यक्तित्वाची चव आणि ऊब यांसह.
हा सरावाचा भाग असतो.
एखाद्याची कल्पना खुजीच राहते
व्यक्तित्वच कमी पडल्यामुळे
त्याला इलाज नाही.

मोठा कलावंत, छोटा कलावंत
छोटेमोठे मान देतघेत जगतात,
यशापयशांनी हेलकावत राहतात.

ज्यांनी कलावंत व्हायचे ठरवलेच नाही
ठरवूनही किंवा ज्यांना होताच आले नाही
असे खूप असतात.

त्याऐवजी कुणी डॉक्टर, प्रोफेसर,
कामगार, वकील, भाजीवाले, कारखानदार,
हॉटेलवाले झालेले असतात -- छोटेमोठे.

कलेचा आणि धर्माचा संबंध काय
हे दिसत नाही
तेव्हा असे असते.

-0-0-

टिकण्याचा प्रश्नच नसतो
कब्जा नसतो घेतलेला जेव्हा
कुणीच कशाचाच --

खालचा मेंदू ताणविहीन
असणे हे सर्वसमावेशक
सौंदर्य...

-0-0-

बहुतेक सर्वच
कलेचा उगम
खालच्या मेंदूच्या ताबास्थितीतून
स्थिर आणि सवयीच्या

त्यामुळे तीच सवय अधिक
प्रस्थापित आणि घट्ट
होत राहते -- ताणमय,
विध्वंसक.

तशा स्थितीत जगणाऱ्यांना

अशी कला वगळणे
कल्पनेतही अमान्य
किंबहुना संतापजनक.

याच ताबास्थितीतून
ते करतात समीक्षा,
रसग्रहण आणि जीवनाचा महान
प्रत्यय आल्याचे सांगत राहतात...

-0-0-

खालच्या मेंदूच्या ताबायंत्रणेच्या
भूमीवरच
कला, साहित्य, संस्कृती, परंपरा
इत्यादींचे अनुभवरूप पीक ---
त्याच भूमीवर अन्वय, चर्चा,
मतभेद, विद्रोह आणि
असंख्य वाद. शिवाय माईलस्टोन्स.

वेदनामय ताणातून बाहेर
येण्याची प्रक्रिया
यात जर नसेल तर
हे नुसते निरर्थकच नाही --
विध्वंसकही आहे.

इतकी पाने भरून विचार
हा नुसता
जगण्याचा चोथा.

ताबायंत्रणेत
अन्यायाची रूपे बदलता येतात
पण माणूस
अन्यायग्रस्तच राहतो.

-- हे असे म्हणजे कलेला
उद्दिष्ट चिकटवणे झाले --
याचा आम्ही निषेध करतो --
हा त्या भूमीवरून आलेला
अंतिम निरोप.

-0-0-
आपापल्या भूमीत पाय रोवून
उभे राहणारे कलावंत
अलगतेचे बळी असतात.
-0-0-

या मृतवत् संस्कृतीला
म्हणजे मला
जागे होणे शक्य आहे का
हे विचारण्यासाठीही
या संस्कृतीचीच
मदत लागेल

मी तर मार खात
पडून राह्यला
सोकावलेला

दुसरीकडे जा शक्यतर
म्हणजे तरी कुठे ?
माझ्याव्यतिरिक्त कुठे ?

मग मारत राहा धडका
कुणालाच
ऐकायची इच्छा नसलेल्या

नाहीतर आपला पडून राहा
धडका खात
ऐकल्या जाणाऱ्या.

-0-0-

लुटारूंना प्रसिध्दी
मद्यविक्रेत्यांना पैसा
स्वप्नविक्रेत्यांना मान
असा चौफेर बंदोबस्त.

तुमच्या प्रत्येक हालचालीवर
लक्ष. तुमचे टाइमटेबल
आखलेले यशाच्या दिशेने
जे प्रयत्न प्रगतीसाठी हवेत.

उघडउघड सगळे जगणे
हिंसक. म्हणून आता तर
अधिकच मोठी गरज
यशस्वी होणाऱ्यांची.

-0-0-

ताबायंत्रणेव्यतिरिक्त इतर प्रश्न
ते परिस्थितीचे प्रश्न
ताबायंत्रणाच संशयास्पद करणारे प्रश्न

ते जगण्याचे प्रश्न

जे क्वचितच पाहिले जातात
कलेकडून.

-0-0-

मूल्यांचे गौरव
मूल्यभ्रष्टांचे पराभव
मूल्यवानांचे पराभव
अन् मूल्यऱ्हासाचा अंधार

किंवा असेच काही
-- याहून काय वाटणार ?
कोणता मूड व्यापणार ?

तेवढ्यापुरते किंवा समजा
आयुष्यभरचे
हेच खरे वाटले तरी
वेगवेगळे वाटू शकते
हेच किती भयानक.

काय वाटले
कसे रंगवले
याच्या प्रचंड चर्चा
-- संशयातीत.

-0-0-

कंटाळा सुशोभित
करून देणारी कला
यशस्वी.

दुःखात पिचणे
मान्य असलेला समाज
यशपूजक.

-0-0-

## आणि हो, माझ्याबाबत...

कळूनही ते न जगण्याचा
माझा ताठरपणा
फारच तीव्र
आणि त्याला खतपाणी घालणारे

नातेवाईक, मित्र, सहकारी, शेजारी...

ते मला वेगळा पाहू इच्छित नाहीत
मी त्यांना वेगळा दिसायला मलाही नको आहे
सगळे नाशवंत मनांचे भ्रम
पण या क्षणी कुरघोडी करणारे

याचा मला कंटाळा येतो
असेही म्हणता येत नाही
कारण तिथेच मी चिकटून

काय गरज आहे या फंदात पडायची
इथपासून
आपल्यासारख्या लुंग्यासुंग्यांची
ही कामे नव्हेत
इथपर्यंत

एका क्षणात
उलथून पडू शकतेय हे सगळे

मला कळत नसल्याचे
माझे ढोंग जगवणे
हेच सध्या
महत्त्वाचे ठरते आहे ...

-0-0-

दुसऱ्याच्या प्रतिक्रिया अनुकूलच हव्या असतील
आणि शिवाय
आपल्यात अपराधी भाव असतील
तर उत्स्फूर्तता ठार मेली समजा.

अलगतेतला अंतर्विरोध
ही विकृती जितकी तीव्र
तितका जगण्याचा चुथडा.

व्यक्तिमत्वविकासाच्या यशपूजक जगात
तडफडत सडत राहणेच जगणे.
कारण परिपूर्ण धोका मुळीच नको.

-0-0-

अमुक झाल्यावर तमुक
करायचे ठरवले तर
चालूच राहतात यातना

स्वतःचे प्रेत सडत राहिल्याच्या
आणि ताबडतोब जगणे
तर अशक्य करतेय व्यवहारचतुर मन
आणि
आज ना उद्या सोडावीच लागेल लाज
या विधानानेच सध्या
पडतोय पडदा बोधप्रद.

बाहेरून आत
प्रेतावर होणारे परिणाम
यातनामय
मिरवले जाणारे
अनुभवाचे शहाणपण म्हणून.

-0-0-

मी माझ्या जुन्या पापांना
आणि माझ्या
वाढत असलेल्या स्वभावाला
घाबरतो
-- याच गोष्टी मला
नको त्या संकटात लोटतील

ही भीती आहे म्हणून मी आहे
एवढे मात्र निश्चित.

निर्भय कसे होता येईल ?

-0-0-

व्यक्तिस्वातंत्र्य, समता,
बंधुत्व आणि न्याय
ही मूल्ये
खालच्या मेंदूच्या
खोट्या सत्ताकेंद्रासाठी
मानलेली आहेत...
हे सत्ताकेंद्र समूळ
फेकले जाण्याच्या
जागृत कृतीत
या शब्दांची गरज नाही...
आणि या सत्ताकेंद्राच्या भ्रमात
ही मूल्ये
अस्तित्वात असू शकत नाहीत...

-0-0-

कोणत्याही क्षणी पुन्हा भ्रष्ट
होणे शक्य
कष्टविहीनता ही काही
कमाई असू शकत नाही

कमाईची स्थितिशीलता
सवयीने सतत सुरक्षित
वाटते

मानसिक सुरक्षिततेचे
सतत प्रयत्न
कष्टमय

हेच वेगळे पाडणारे सगळे
भ्रष्ट

आणि लोक शोधतात
भ्रष्टतेचे मूळ
कृतींत आणि घटनांत

या सर्व टाळाटाळीत
कष्टविहीनता
शक्य नाही

मानसिक सुरक्षिततेची किंमत
दुःखमयता
-- हेच भ्रष्ट होणे
-- सतत शक्य.

-0-0-

दुःख म्हणजेच मी
अन् मला तर जगायचे आहे

त्यापेक्षा माझ्याशिवाय जगावे
शिवाय हे बदलणारे नाही
याच्याहून काहीच नाही

परस्पर जगणे चालू
आणि नुसती
जिवंत विश्रांती ...

-0-0-

माझी अलगता गेली

तर सगळ्यांचीच जाते.
मी त्यांचे भ्रम खरे धरणार
म्हणजे माझाच भ्रम...

अलगतेशिवाय माझे वागणे
प्रत्येक अलगतेला धोका...
या बाबतीत उद्‌भवणारे
हे शेवटचे भ्रामक विचार...

-0-0-

माझा शब्द
त्याला लागावा
अशी माझी इच्छा नव्हती.
तो दुखावला
अनपेक्षितपणे
जे मला जाणवले.
आणि सुरू झाली
पुन्हा
अलगतेची जीवघेणी साखळी.

-0-0-

एक आणि अनेक नाहीच
मग कोण कुणाला सांगणार ...

सगळ्यांना ही दरी ओलांडणे
शक्य आहे... मग दरी नाही...

इतके धर्म, इतके शब्द
अनावश्यक...

-0-0-

मागचे जन्म वगैरे
गृहीत न धरले तरी
सर्व गोष्टींना कार्यकारण साखळी
असणारच -- हा तर सरळ तर्क

माझेच असे का,
मनस्ताप, दुःख, न पटणाऱ्या,
न आवडणाऱ्या परिस्थिती,
वगैरे तर्कसंगतच

म्हणजे या साखळीशिवाय

जगण्याची वस्तुस्थिती
नसेल तर
निव्वळ त्रस्त...अटळ जगणे...

-0-0-

माझ्याशिवाय हे 'आहे असे ' नीट
चालेल की नाही
ही सतत काळजी

'आहे असे ' म्हणजे सततची बोंब,
ताणतणाव आणि असंख्य संबंध
दुरुस्त करत राहण्याचे प्रयत्न

-0-0-

स्वतःचे दुर्लक्ष नसलेल्या कृतीला
कुणाचेही दुर्लक्ष
स्पर्शू शकत नाही...

-0-0-

मी नसण्याची वस्तुस्थिती
फायद्याची की तोट्याची
आणि मुख्य म्हणजे
मला
आवडणारी -- चालणारी आहे का
हे मी पाहू इच्छितो

मी म्हणजे फक्त क्लेष
हे माहीत असून.

-0-0-

वस्तूचा दर्जा किंमतीत मान्य केल्याप्रमाणे
नसल्यास
मन कुरतडले जात राहते
-- हे नुकसान पैशात किती ?

एकमेकांनी एकमेकांना डिस्टर्ब करू नये
हाही एक अपेक्षित दर्जा
जो नाही
-- हे नुकसान कशात, किती ?

कुठेकुठे मोजणार कशात किती

आणि मोजले तरी काय ?

नुकसानीची कारणे नाहीत
अशी परिस्थिती संपूर्ण
माझ्याबाहेर सर्वत्र रचता येईल ?

-0-0-

मन आकुंचन पावण्याची अपराधी प्रतिक्रिया
अशा अशा प्रसंगी येणारी
येऊ नये म्हणून आटोकाट प्रयत्न
ज्यांमुळे ती अधिकच गडद

मनाच्या प्रयत्नाने
मन अधिक तीव्र,
संघर्षमय, कधी एकदा
हे प्रसंग संपतील असे

कहर म्हणजे
मन
टाकले जाऊ शकते
-- असे पाहिले गेलेले असून ...

-0-0-

दुसऱ्याचे वागणे
हा प्रॉब्लेम असतो तेव्हा
त्या व्यक्तीला सुधारणे
हे उत्तर नसते

दुसऱ्याचे वागणे
हा प्रॉब्लेम नसणे
हेच फक्त घडू शकते
ज्यात सगळे प्रॉब्लेम्स विलीन...

-0-0-

मी लुप्त
सगळे रिक्त
अन् अमर्याद

स्वतःला टाकण्याची
धडपड थांबण्याचाच
प्रश्न होता

मग एवढे मोठे
साम्राज्य
कशासाठी होते ?

जरी किरकोळच होते
माझ्या
एवढे ?

जे नाही त्याबद्दल
प्रश्न आहेत आणि
उलट.

-0-0-.

प्रश्न म्हणजे वेस्टेज
-- ना उपयोग -- ना किंमत --
त्यांचे काहीही करायचे नाही

-- नुसते टाकायचे --

-0-0-

भ्रामक सत्ताकेंद्र
शरीरांतर्गत ताण निर्माण करून
समतोल बिघडवते

इच्छेप्रमाणे
घडेनासे होते
आणि पराभूतता येते
तेव्हा सत्ताधीश वेडा होतो.
बलात्कार होतात.
खून होतात.
युध्दे होतात.

नंतर चर्चा होते
असे का घडले याची
आणि
हे टाळण्याच्या योजनांची --
ज्याच्यात्याच्या नियंत्रणाखाली.

-0-0-
जगही बाहेर, मीही बाहेर --
आता सर्व एकच --
आतही नाही, बाहेरही नाही ...
-0-0-

नशीब टाकण्याशी
नशीबाचा संबंध नाही.

नशीब न टाकता
मी नशीबवान
अजून अजून अजून अजून यांचा
धावता, धडपडता, तडफडता
आणि मधेच इतरत्र
तृप्तीचा दृष्टिक्षेप टाकणारा
मायाळू.

नशीबाला माझी साथ
असेपर्यंत सुटका नाही
जरी मधूनमधून
मी विचारले --
हेच आयुष्य ?

मीच नशीब.
नशीबाबाहेरचे
मला कसे काही कळणार ?

अचानक नशीब
नसलेले पाहण्याच्या क्षणी
कळले --
नशीबाची गरज नाही
-- असण्यासाठी.

-0-0-

आधार लागत नाही
हे पाहूनही
मी घट्ट धरून ठेवतोय
माणसे, प्रसंग, भविष्य.

हे न सोडता
मला हवे आहे
आधारहीन स्वातंत्र्य
कदाचित्
याहून भरंवशाचा
आधार म्हणून.

सगळे स्वच्छ पाहूनही
चालणारा हा संघर्ष--
हसले तरी चालेल
रडले तरी चालेल

असा.

यावर काहीतरी
केलेच पाहिजे
असे म्हणत असतानाच
लक्षात येतेय --
मी काहीच करायला नकोय.

-0-0-

कशा प्रकारची पोझ
प्रेझेंट करायची आहे
हे ठरूनही
तसे जमण्याची खात्री नाही
-- या अनिश्चिततेमुळे
आत्मविश्वास डळमळतो
आणि हमखास चुका होतात.

हे सगळे नीट होण्याचा उपाय
अशक्य आहे -- तर
ज्या मटेरियलने पोझ घ्यायची
ते सगळे टाकून देता येईल ?
आत्मविश्वासाच्या
गरजेसह ?

-0-0-

मेंदूतली एक चूक समजणे
एवढे साधे पण
सर्वांच्या विरोधाने
कर्मकठीण झालेले

पापी, पश्चात्तापदग्ध,
निराश, महत्त्वाकांक्षी,
हिंसक आणि बळी झालेला असाही

कुणीही हे पाहू शकतो
अन् क्षणात
परंपरागत भूमिकेतून
बाहेर पडू शकतो.

आता जगणे
भूमिकेच्या भूमीत नाही ...

-0-0-

खालच्या मेंदूची ताबायंत्रणा
इथे नको आहे
हे पाहणे आणि
सोडून देणे
एवढेच सगळे आहे.

अहंकार, स्वार्थ,
जाणीव, नेणीव,
माहिती, स्मृती,
विचार, भावना,
आणि वागण्याच्या पध्दती
यांची सविस्तर चिकित्सा
करायचा प्रश्नच नाही.

खालचा मेंदू ताणमुक्त
म्हणजे जे आहे ते सगळे
बरोबर
आणि अमर्याद शांततायुक्त जिवंत...

-0-0-

खालच्या मेंदूने घेतलेल्या
चुकीच्या जबाबदारीवर आधारित
मानसशास्त्राची निर्मिती

खालच्या मेंदूने
चुकीचे कार्य सोडून दिले की
संपूर्ण मानसशासत्र कोसळते...

-0-0-

एवढे एक केले तर
निःशस्त्रीकरण, डावपेच,
शिखर परिषदा, शांतता
प्रस्थापनेचे प्रयत्न, युध्दबंदी,
युध्दपुकार, आर्थिक निर्बंध,
त्रिशंकू सरकार, बिनशर्त पाठिंबा,
भ्रष्टाचार, तुरुंग, न्यायव्यवस्था,
शब्द पाळणे, खून,
अनैतिक संबंध, अपराधी भाव,
भीती
-- हे काहीच लागणार नाही

-- खालच्या मेंदूचे विचारक्षेत्रावरचे
नियंत्रण टाकून देणे ...
-0-0-

आपण आता
स्वतःच्या आणि दुसऱ्यांच्या
प्रतिमा कंट्रोल करत नाही
हे दुसऱ्यांना कळायला नकोय
असे म्हणणे
म्हणजे तेच झाले.

-0-0-

भाषणे करून, ऐकून
भेदभाव जाणार नाहीत.
खालच्या मेंदूचा चुकीचा वापर
न थांबवता काहीही करा
फोल ठरेल.

-0-0-

खालच्या मेंदूची भ्रामक ताबायंत्रणा
म्हणजेच फलाशा.
म्हणजेच मी.

जे त्याचे कामच नाही
ते तो वर्षानुवर्षे करतो आहे
म्हणूनच ही विदीर्णता ...

-0-0-

एक तर जगणे असते किंवा
खालच्या मेंदूचा ताबा.
ताबा म्हणजे ताण.
ताण म्हणजे भीती.
भीती म्हणजे हिंसा.
ताण आहे तसा ठेवून
निर्भय -- अहिंसक होण्याचे प्रयत्न
हा निव्वळ धुरळा.

हजारो वर्षे
हेच चालू असूनही
डोळे उघडत नाहीत.
बेशुध्दीचे व्यसन.
त्यातच मरण.
ताबा ठेवून वाट्टेल ते
धोके पत्करू --
ताबा सोडण्याचा धोका नको.

ताबा सोडण्यात सर्व धोके नष्ट.
इथे तर धोका हेच पुरुषार्थमूल्य !

हे न पाहता जागतिक
शांततेचे विचार.
स्वातंत्र्य, समता, बंधुत्व, न्याय
यांची स्वप्ने
विध्वंस करणारी
स्वतःसह सर्वत्र...

-0-0-

न आवडणाऱ्या घटनेने
पुन्हा ताबा सुरू होतो --
इथेच तर खरे तर
तो सोडलेला हवा

वरच्या मेंदूला
फक्त वस्तुस्थिती
खालच्या मेंदूला
राग, लोभ, त्रागा.

-0-0-

भ्रम जाळणारा अग्नी
कसा हवा ते सांगायला
एक भ्रम समोर आला...
... जळून गेला...

-0-0-

वरच्या मेंदूच्या कार्यावर
खालच्या मेंदूचा ताबा असणे
हेच दुःख.
दलितांचे दुःख, पांढरपेशे दुःख,
शहरी दुःख, ग्रामीण दुःख,
पुरुषाचे दुःख, स्त्रीचे दुःख
-- ही सगळी वर्गवारी
कृत्रिम.

व्यवस्था निर्माण करण्याच्या कृती
दुःखातूनच आल्या पाहिजेत
ही एक मूर्ख कल्पना.

-0-0-

ताबायंत्रणेला सुखाच्या संवेदना
हव्यात
त्यात कोणतेही अडथळे
नकोत.

ताबायंत्रणेच्या ताणाची शक्ती
ठरवते
तो कितपत प्रभावी हुकूमशहा
होऊ शकेल ते.

कमी शक्तीचे सर्वजण
जास्त शक्ती असलेल्याला
म्हणतात हुकूमशहा आणि ठेवतात
मूल्याच्छादित आपली कमकुवत.

-0-0-

ऐच्छिक ताबायंत्रणेच्या अनुपस्थितीत
लिंगजाणीव नाही.

असंख्य छळांचा, दुःखांचा,
वेदनांचा उगम
या सततच्या
लिंगजाणीवेत...

-0-0-

दुसऱ्या व्यक्ती
ताबानियंत्रण कक्षेत वावरतात
हे गृहीत धरून वागल्यास
स्वतचेही ताबानियंत्रण चालू ...

-0-0-

दरवाजे बंद आहेत
हे माहिती आहे.
हाच कसा काय
निष्कर्ष ?

-0-0-

विरोधाच्या तीव्रतेत
काहीच ऐकू जाणार नाही
हे स्पष्ट झाले.
बाहेरून नाही --

आतूनच मोहीम चालवावी लागेल ...

-0-0-

आळसाचा मार्ग
कष्टमय --
पुन्हापुन्हा तोच.

विनाकष्ट जाग
क्षणात निसटणारी
कणभरही कष्टाने.

-0-0-

विचार जेव्हा खालच्या मेंदूला
चिकटलेला नसतो तेव्हा
जगण्याला कुठलीच
प्रणाली नसते.

अमर्यादता असते.

-0-0-

जगता येते, विचारही करता येतो --
फक्त दुःख नाही, अपमान होत नाही
आणि टेन्शन नाही

म्हणजे समाजातून
उच्चाटनच

इथे घोडे पेंड खात राहते --

-0-0-

आळशीपणाला विसावा समजणे
ही सततची चूक
ज्यात सतत संघर्ष,
ताण, वेदना.
विसावा म्हणजे ताण नसणे ...

-0-0-

बोलायला -- वागायला
चुकल्याची खंत --
परिणामांची चिंता --

या सर्व खरे तर
अस्तित्वात नसलेल्या घटना

एक भाग वागणारा
-- एक भाग नियंत्रण करणारा --
या भ्रमात अंगभूत ---

एकसंध जगण्यात
हे काही नाही.

-0-0-

नवीन म्हणजे
सवयीबाहेरचे

ते नको आहे.

सवयीतले वेगवेगळे
असे नवीन चालेल.

त्यावर चर्चा,
परिसंवाद
सर्व करू.

म्हणजे एकूण
बरे चालेल.

-0-0-

अस्वस्थता
म्हणजे खरे तर
लांबणीवर टाकणे

विच्छिन्नता घालवण्याची
इच्छाच
तिला टिकवून धरते.

-0-0-

विभाजन नसण्यातच फक्त
असणारी नीती
विभाजनात असत नाही.

विभाजन नसणे
म्हणजे एखादी उपयुक्त

मानता येणारी कसरत नव्हे ...

-0-0-

सगळ्यांच्या सवयी
एकमेकांना जखडतात

खालच्या मेंदूचे अनावश्यक कार्य
चालू राहते

यातच जगणे सुखावह करण्याचे
करार होतात

वीष पीत बिनविषारी
जगण्याचे मनसुबे

रचले जात घट्ट होत राहतात
एकमेकांच्या आधाराने ...

-0-0-

दुभंगतेतून
जितका अधिक
आणि जितका तीव्र विचार
तितके जगणे
अधिक विच्छिन्न ...

-0-0-0-0-0-

पत्ता :-- चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.,
चिंतामणीनगर, सावरकर पथ,
सहकारनगर नं.२,
पुणे - ४११ ००९

**दूरध्वनी -- ४२२ ७८४७.**